भ्रष्टाचार प्रतिबंध अधिनियम १९८८ अंतर्गत अभियोग दाखल करण्यास विहित कालावधीत मंजुरी देणे तसेच गट - अ व गट - ब मधील राजपत्रित अधिकारी यांच्या बाबतीत प्रशासकीय विभागस्तरावर निलंबन आढावा समितीचे गठन करणे

# महाराष्ट्र शासन

## महसूल व वन विभाग

**शासन निर्णय क्रमांकः निप्रआ -२०१५/ प्र.क्र.१०५/ई-४**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक: ८ मे, २०१५

**वाचा :-**

१) शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक निप्रआ- ११११/प्र.क्र.८६/११-अ, दि.१४/१०/२०११
२) शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक अभियो-१३१२ /प्र.क्र.३० / पुनर्बांधित-१ / ११-अ, दि. १२/२/२०१३
३) शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक अभियो - १३१४/प्र.क्र. ८६/११अ, दि. ३१/१/२०१५

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपील) नियम १९७९ च्या नियम ४ मधील पोटनियम ५ खालील खंड (क) च्या परंतुकानुसार शासकीय कर्मचा-यांवर फौजदारी गुन्हा दाखल करण्यात आल्यामुळे त्यास निलंबित करण्यात आले असेल तर अशा प्रकरणांमध्ये निलंबित कर्मचा-यांच्या निलंबन आदेशात फेरबदल करण्यापूर्वी वा तो रद्द करण्यापूर्वी शासनाने या प्रयोजनार्थ गठित केलेल्या निलंबन आढावा समितीची शिफारस प्राप्त करुन घ्यावी, अशी तरतुद विहित करण्यात आली आहे. या तरतुदीच्या अनुषंगाने संदर्भ क्र. १ येथील सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय दिनांक १४.१०.२०११ अन्वये गट-अ व गट-ब मधील कर्मचा-यासाठी मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली “निलंबन आढावा समिती” गठित करण्यात आली होती.

सदर शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, दि. १४/१०/२०११ मधील परिच्छेद २ अ) (i) येथील मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील समितीऐवजी संबधित प्रशासकीय विभागाच्या अ.मु.स./ प्र.स./ सचिव यांच्या अध्यक्षतेखाली त्या त्या प्रशासकीय विभागाच्या अखत्यारीतील गट-अ व गट-ब मधील अधिका-यांच्या निलंबन विषयक प्रकरणांचा आढावा घेण्याबाबत मंत्रालयीन प्रशासकीय विभागांनी त्यांचे स्तरावर “निलंबन आढावा समिती” गठित करावी अशा सूचना संदर्भाधिन क्रमांक ३ येथे नमूद शासन निर्णयान्वये देण्यात आलेल्या आहेत. त्याअनुषंगाने खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

## शासन निर्णय:-

संदर्भाधीन क्रमांक -१ येथील शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, दिनांक १४.१०.२०११ मधील परिच्छेद २ अ) (i) येथील मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील निलंबन आढावा समितीऐवजी महसूल विभागाच्या अ.मु.स/प्र.स./सचिव यांच्या अध्यक्षतेखाली महसूल विभागातील क्षेत्रिय स्तरावरील तसेच मंत्रालयातील महसूल व वन विभागातील गट-अ व गट-ब संवर्गातील राजपत्रित अधिकाऱ्याचे निलंबन विषयक प्रकरणांचा आढावा घेण्याबाबत खालीलप्रमाणे "निलंबन आढावा समिती" गठित करण्यात येत आहे:-

**गट-अ व गट-ब कर्मचाऱ्यांबाबत प्रशासकीय विभाग स्तरावरील निलंबन आढावा समिती**

१. अप्पर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव ... अध्यक्ष
२. अतिरिक्त पोलिस महासंचालक, लाचलुचपत प्रतिबंधक विभाग .... सदस्य
३. सह सचिव/उप सचिव, (गृह विभाग) ... सदस्य
४. सह सचिव/उप सचिव, (महसूल विभाग) ... सदस्य सचिव
(विभागीय चौकशी :- ई ४)

२. या समितीने संदर्भ क्र. ३ येथील शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, दिनांक ३१.१.२०१५ मधील परिच्छेद-५ मधील कार्यपध्दतीचे पालन करुन निलंबित अधिकाऱ्यांच्या प्रकरणांचा आढावा घ्यावा आणि निलंबन करण्यास अथवा मागे घेण्यास सक्षम प्राधिकारी यांना सदर समितीने आपल्या शिफारशी सादर कराव्यात. तदनंतर निलंबित शासकीय सेवकास सेवेत पुन:स्थापित करणे व अकार्यकारी पदावर नेमणूक करणे या संदर्भातील शासन सूचनांनुसार कार्यवाही करावी.

३. लाचलुचपत प्रतिबंधक विभागाकडून प्राप्त झालेल्या व विभागाकडे ९० दिवसापेक्षा जास्त कालावधीसाठी प्रलंबित असलेल्या अभियोग दाखल करण्यास मंजुरीच्या प्रकरणांचा, आढावा घेवून निलंबित अधिका-यांची पुन:स्थापना करताना किंवा आरोपी लोकसेवकास निलंबनाशिवाय अन्य पदावर पदस्थापित करताना अकार्यकारी पदावर नियुक्ती आहे किंवा कसे याची तपासणी करुन आणि लाचलुचपत/फौजदारी प्रकरणांत न्यायालयाने शिक्षा केलेल्या कर्मचाऱ्यांवर प्रचलित नियमानुसार कारवाई करण्यासंदर्भात आढावा घेऊन संबंधिताना प्रलंबित कार्यवाहीचा जलद निपटारा करण्याबाबत सूचना समितीने द्याव्यात.

४. क्षेत्रिय स्तरावरील गट-क व गट-ड मधील कर्मचाऱ्यांबाबत अभियोग दाखल करावयाच्या प्रलंबित प्रकरणांचा उपरोक्त नमूद समितीने, वेळोवेळी आढावा घ्यावा व त्यासंदर्भातील अहवाल मुख्य सचिव तसेच अपर मुख्य सचिव, गृह विभाग यांना पाठविण्याची व्यवस्था करावी.

५. वरील सुधारणांव्यतिरिक्त संदर्भाधीन शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, दिनांक १४.१०.२०११ व दिनांक १२.०२.२०१३ मधील अन्य तरतुदींमध्ये कोणताही बदल करण्यात आलेला नाही, त्या तरतुदी तशाच लागू राहतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या [www.maharashtra.gov.in](http://www.maharashtra.gov.in) या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०१५०५०८१६५०४९२६१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Manik Abaji Gutte

Digitally signed by Manik Abaji Gutte
DN: CN = Manik Abaji Gutte, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Deputy Secretary
Date: 2015.05.08 16:51:23 +05'30'

**मा.आ. गुट्टे**
शासनाचे उप सचिव

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव
२. मा. मुख्य मंत्री यांचे प्रधान सचिव
३. मा. मंत्री (महसुल) यांचे खाजगी सचिव
४. मा. राज्यमंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव
५. शासनाचे मुख्य सचिव / सर्व अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/सचिव
६. अप्पर मुख्य सचिव (सेवा) सामान्य प्रशासन विभाग
७. प्रधान सचिव (महसूल) यांचे स्वीय सहायक
८. महासंचालक, लाचलुचपत प्रतिबंधक विभाग, वरळी, मुंबई
९. सर्व विभागीय आयुक्त /जमाबंदी आयुक्त आणि संचालक भुमी अभिलेख, महाराष्ट्र राज्य/ सर्व जिल्हाधिकारी/ सर्व उपसंचालक भुमी अभिलेख
१० सर्व उपसचिव/ सहसचिव (महसूल)
११.कार्यासन ई, ई-१,ई-१अ, ई-२, ई-३,ई-४अ, ई-५,ई-६, ई-९,ई-१०
१२. निवड नस्ती (ई-४)